**अधिकृत आंतरराष्ट्रीय स्पर्धेत सहभागी होणाऱ्या होतकरु खेळाडूंना प्रशिक्षण व इतर बाबींसाठी आर्थिक सहाय्य देणेबाबत.**
**निधी वितरणाबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : राक्रीधो- ३२१८/प्र.क्र. २०७/क्रीयुसे -३**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
दिनांक :- २६ ऑक्टोबर, २०१८.

**वाचा :-** १) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्र.क्रीडाधो-३११३/ प्र.क्र.२९/ क्रीयुसे-३ , दि. २८/४/१४.
२) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०१६/प्र.क्र.६९/अर्थसं-३, दि.२/४/१८
३) क्रीडा व युवक सेवा, म.रा., पुणे यांचे पत्र क्रमांक आखेआस/नि.समिती शिफारस/प्रस्ताव/२०१८-१९/का-६/३३८०, दि.२३/८/१८.

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र राज्यातील खेळाडूंनी आंतरराष्ट्रीय स्तरावर दर्जेदार कामगिरी करुन पदक विजेते खेळाडू तयार व्हावेत तसेच राज्यातील खेळाडूंना अधिकृत आंतरराष्ट्रीय स्पर्धेत भाग घेण्यासाठी प्रोत्साहन मिळावे व अत्युत्कृष्ट कामगिरी करण्याकरिता आवश्यक असलेले तज्ञ क्रीडा प्रशिक्षकांचे मार्गदर्शन, स्पर्धापूर्व प्रशिक्षण, प्रवास खर्च, उपकरणे-क्रीडा साहित्य, इ. उपलब्ध करता यावेत यासाठी शासन निर्णय शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्र. क्रीडाधो-३११३/ प्र.क्र.२९/ क्रीयुसे-३ दि. २८ एप्रिल, २०१४ अन्वये आर्थिक सहाय्य देण्यात येते. सन २०१७-१८ मध्ये सदर उपक्रमाकरीता रु. ३०.९८ लक्ष इतका अर्थसंकल्पित निधी खर्ची टाकण्यात आला आहे. सन २०१८-१९ या कालावधीत प्रस्तुत योजनेच्या अंमलबजावणीकरिता अर्थसंकल्पित करण्यात आलेल्या रु.१००.०० लक्ष इतक्या तरतुदीपैकी वित्त विभागाच्या दि. २/४/२०१८ च्या परिपत्रकानुसार ७० % च्या मर्यादेत रू. ७०.०० लक्ष तरतुदीपैकी रु.२०.०० लक्ष इतक्या निधीच्या वितरणास मान्यता देण्याची बाब या नस्तीच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

राज्यातील खेळाडूंना अधिकृत आंतरराष्ट्रीय स्पर्धेत भाग घेऊन अत्युत्कृष्ट कामगिरी करण्याकरिता प्रोत्साहन मिळावे तसेच याअनुषंगाने येणाऱ्या इतर बाबी विचारात घेऊन त्यांना आर्थिक सहाय्य मिळण्याच्या अनुषंगाने दि.७ ऑक्टोबर, २०१७ अन्वये गठीत करण्यात आलेल्या निवड समितीमार्फत निवड झालेल्या पुढील ४ खेळाडूंची खालील तक्त्यात नमूद केलेल्या स्पर्धेकरिता निवड झाली असून, सन २०१८-१९ या वर्षाकरीता अर्थसंकल्पित निधीपैकी सदर ४ खेळांडूस प्रत्येकी रु.५.०० लक्ष या प्रमाणे रु.२०.०० लक्ष (अक्षरी रुपये वीस लक्ष फक्त) इतकी तरतूद अर्थसहाय्य म्हणून वितरीत करण्यास व सदर रक्कम आयुक्त, क्रीडा व युवक सेवा संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्या अधिनस्त ठेवण्यास याद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | खेळाडूचे नाव | खेळ खेळप्रकार/ | आंतरराष्ट्रीय स्पर्धा |
|---|---|---|---|
| १ | कु.राही जीवन सरनोबत जि.कोल्हापूर | नेमबाजी /शुटिंग | एशियन गेम्स २०१८ व वर्ल्ड चॅम्पियनशिप,२०१८ |
| २ | कु.सायली राजेंद्र शेळके जि.सातारा | रोईंग | एशियन गेम्स २०१८ स्पर्धेकरिता निवड |
| ३ | कु.सायली संजय केरीपाळे जि.पुणे | कबड्डी | एशियन गेम्स २०१८ स्पर्धेकरिता निवड |
| ४ | कु.श्रेया संजय नानकर जि.पुणे | स्पोर्ट क्लाइम्बिंग | एशियन गेम्स २०१८ स्पर्धेकरिता निवड |

२. उपरोक्त संदर्भात होणारा खर्च "मागणी क्रमांक: ई-३, २२०४ क्रीडा व युवक सेवा-१०४ क्रीडा व खेळ (०८)(०४) आंतरराष्ट्रीय क्रीडापटूंना प्रशिक्षण, खेळाचे सामान, मार्गदर्शन शुल्क इत्यादींसाठी सहाय्य (कार्यक्रम) (२२०४ ५६५३) ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर) या लेखाशिर्षाखालील मंजूर तरतूदीमधून भागविण्यात यावा. सदरचे अनुदान ज्या प्रयोजनासाठी मंजूर करण्यात आले आहे त्याच प्रयोजनासाठी खर्च करण्यात यावे.

३. वित्त विभागाच्या दि.२/४/२०१८ च्या शासन परिपत्रकानुसार खालील बाबी नमूद करण्यात येत आहेत.

३.१ . वित्त विभागाच्या सदर परिपत्रकान्वये निधी वितरणाचे अधिकार विभागास आहेत.

३.२. यापूर्वी वितरीत केलेल्या अनुदानापैकी ७५% पेक्षा अधिक खर्च झाला आहे.

३.३. ज्या लेखाशिर्षाखाली अनुदान वितरीत करण्यात येत आहे त्या लेखाशिर्षातंर्गत गतवर्षापूर्वीचे संक्षिप्त देयक प्रलंबित नाही.

४. वित्त विभागाच्या संदर्भाधिन दि. २/४/२०१८ च्या परिपत्रकातील सूचनांनुसार उपरोक्त तरतूद खर्च करण्याबाबतची कार्यवाही करण्यात यावी. यासाठी लेखाधिकारी, क्रीडा व युवक सेवा संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना आंहरण व संवितरण अधिकारी तर आयुक्त (क्रीडा) यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१०२६१५२९५५८९२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Rajendra Shankarrao Pawar

Digitally signed by Rajendra Shankarrao Pawar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School Education and Sports Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=679184b88f7019ef64ad6ddc2495ca280267c0d47 55ce63fa70c45cf755d9373, cn=Rajendra Shankarrao Pawar
Date: 2018.10.26 15:36:54 +05'30'

**( राजेंद्र पवार )**

शासनाचे उप सचिव.

**प्रत,**

१. मा.मंत्री ( शालेय शिक्षण व क्रीडा )यांचे खाजगी सचिव

२. मा.अपर मुख्य सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई.
३. आयुक्त, क्रीडा व युवक सेवा संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
५. महालेखापाल (लेखा व परिक्षा), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
६. वित्त विभाग (व्यय-५), मंत्रालय, मुंबई.
७. सर्व विभागीय उपसंचालक, क्रीडा व युवक सेवा (संचालनालयामार्फत)
८. सर्व जिल्हा क्रीडा अधिकारी ( संचालनालयामार्फत )
९. लेखाधिकारी, क्रीडा व युवक सेवा संचालनालय,महाराष्ट्र राज्य, पुणे.
१०.वरीष्ठ कोषागार अधिकारी, कोषागार कार्यालय, पुणे.
११.निवडनस्ती, क्रीयुसे-३